नेरळ, ता. कर्जत, जि.रायगड येथील आदिवासी मुलींचे वसतीगृह इमारतीच्या दुरुस्तीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवबां-२०१०/प्र.क्र.४२/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.**

**शासन निर्णय** : उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, कर्जत, जि.रायगड यांनी शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह नेरळ, ता.कर्जत, जि.रायगड इमारतीच्या दुरुस्तीसाठी एकूण रुपये ३,३२,४४४/- इतक्या रकमेची ७ अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत.

२. सदर अंदाजपत्रके उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, कर्जत, जि.रायगड यांनी तयार केली आहेत.

३. सदर वसतीगृहाच्या दुरुस्तीसाठी एकूण रुपये ३,३२,४४४/- (अक्षरी रुपये तीन लाख बत्तीस हजार चारशे चव्वेचाळीस फक्त ) इतक्या रकमेस खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वसतीगृहांचे नाव | कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रुपये. |
|---|---|---|---|
| १ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतीगृह नेरळ, ता. कर्जत, जि. रायगड | शौचालय/स्नानगृहाची टाकी व ड्रेनेज लाईनचे बांधकाम करणे. | ५०,०००/- |
| २ | | खराब झालेल्या भितीना गिलाव करणे. | ५०,०००/- |
| ३ | | इमारतीच्या कौलारु छताची दुरुस्ती करणे. | ४९,९४९/- |
| ४ | | इमारतीचे आतून बाहेरुन रंगकाम करणे. | ३२,४९५/- |
| ५ | | तुटलेले दरवाजे व खिडक्या दुरुस्त करणे. | ५०,०००/- |
| ६ | | इमारतीमध्ये नळपाणी पुरवठा जोडणी करणे. | ५०,०००/- |
| ७ | | इमारती मधील विद्युत फिटींग करणे. | ५०,०००/- |
| | | **एकूण** | ३,३२,४४४/- |

४ सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० साठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०००२२६१७२७२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. कों. आहिरे )
कक्ष अधिकारी

प्रति,

महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ (विशेष प्रकल्प), नवी मुंबई.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रायगड.
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, जि. रायगड.
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, कर्जत, जि.रायगड.
सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)